**वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८**
**भाग पहिला, उप विभाग-एक ते पाच मध्ये प्रदान करण्यात**
**आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये नव्याने समाविष्ट वित्तीय अधिकार**
**भाग पहिला, उप विभाग - एक, अनुक्रमांक १८-अ**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक विअप्र-१०.०३/प्र.क्र. १५/२००३/विनियम
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ९ एप्रिल २००३

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०००/प्र.क्र.४६/ २००१/ विनियम, दिनांक ११ जुलै २००१ नुसार राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख, प्रशासनिक विभागांतर्गत विभाग प्रमुख, क्षेत्रीय विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-एक ते पाच पैकी प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये **नव्याने** वित्तीय शक्तींचा समावेश करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ जुलै २००१ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियमावली, १९७८ मधील अधिकारात भाग पहिला, **उप विभाग - एक मध्ये अनुक्रमांक १८ - अ** नव्याने समाविष्ट करण्यात येत असून शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येत आहे.

३. ह्या आदेशान्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर हा शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण-२००१/प्र.क्र.८९/३१, दिनांक ३ जानेवारी २००३ (प्रत सोबत जोडली आहे ) अर्थसंकल्पीय तरतूद आणि वित्तीय प्रकाशने, नियम व विनियमन ह्यामध्ये समाविष्ट केलेल्या किंवा अंमलात असलेल्या आदेशांचे अधीन राहील.

४. ज्या प्रशासकीय विभागांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. जेथे एखाद्या अधिकाऱ्याचे असे विद्यमान अधिकार वित्तीय मर्यादेच्या किंवा इतर कोणत्याही शक्तींच्या दृष्टीने अधिक उदार असतील तेथे, असे अधिकार ज्या शर्तींच्या अधीन प्रदान करण्यात आले असतील त्या शर्तींच्या अधीन ते अधिकार यापुढेही अंमलात राहतील असे मानले जाईल.

५. ज्या प्रशासनिक विभागांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत त्यांनी अशाप्रकारे त्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा सर्व स्तरांवर कोणताही हस्तक्षेप, भिती अथवा अनुग्रह याशिवाय त्याचा पूर्णपणे व परिणामकारक वापर करण्यात येत असल्याची खात्री करून घ्यावी.

६. वित्तीय अधिकार नियमावली-१९७८, भाग-पहिला आणि संबंधित नियम यामध्ये जेथे सुधारणा आवश्यक आहेत, अशा आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अं. ज. खानविलकर,**
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

**सहपत्र -** (१) परिशिष्ट
(२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्रमांक - संकीर्ण-२००१/प्र.क्र.८९/३१, दि. ३ जानेवारी २००३.

१प्रति,

- प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
- महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
- महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
- राज्यपालांचे सचिव,
- मुख्य मंत्र्यांचे सचिव,
- उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
- सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
- मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
- संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ,
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
- अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई - ५१,
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
- मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,
- *प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
- *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
- *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्रमांक ३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
- *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
- *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
- *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
- *प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
- उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, नवी मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती,
- उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा कोकण विभाग, नवी मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती,
- सर्व जिल्हा कोषागारे अधिकारी,
- सर्व उप कोषागार अधिकारी,
- मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
- सर्व विभागीय आयुक्त,
- सर्व जिल्हाधिकारी,
- सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
- सर्व जिल्हा परिषदाचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
- विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
- संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ - ८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली,
- वित्त विभागातील सर्व कार्यासने,
- निवड नस्ती, कार्यासन - विनियम, वित्त विभाग,

---

* पत्राद्वारे.

(शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०.०३/प्र.क्र. १५ /२००३/विनियम, दिनांक ९ एप्रिल २००३ चे परिशिष्ट )

**वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८**

**भाग-पहिला**

**उप विभाग--एक**

**मुंबई वित्तीय नियम, १९५९ अन्वये " नव्याने " प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार**

भाग--पहिला, उप विभाग -एक

| अनु क्रमांक | नियम क्रमांक | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १८ - अ | १४२ - क | मा.राज्यपाल, मा. मुख्यमंत्री, मा. उपमुख्यमंत्री व मा. मुख्य सचिव यांनी बोलाविलेल्या बैठकांव्यतिरिक्त मा. मंत्री महोदय मंत्रालयीन प्रशासनिक विभागांनी मुंबई येथे आयोजित केलेल्या बैठकांकरिता विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी /जिल्हा परिषद यांना खाजगी हॉटेल अथवा विश्रामगृहात राहण्यासाठी खर्च मंजूर करणे. | अशी बैठक आयोजित करणारा विभाग (त्या विभागातील प्रशासन/आस्थापना/ कार्यालयाचे प्रभारी/सह-सचिव/उप सचिव धरून). | प्रति अधिकारी प्रति दिन **रु. २,५००** या खर्चाच्या मर्यादेपर्यंत. | (१) विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना बैठकीसाठी बोलाविण्यापूर्वी संबंधित विभागाने प्रधान सचिव, महसूल यांची पूर्व संमती घेतलेली असली पाहिजे तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना बैठकीसाठी बोलाविण्यापूर्वी सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग यांची पूर्वपरवानगी घेतलेली असली पाहिजे.<br>(२) अशाप्रकारे पूर्व परवानगी न घेता उपरोक्त अधिकारी, मुंबई येथील बैठकांना उपस्थित राहिल्यास त्यांना या शक्तीचा वापर करून खर्च मंजूर करता येणार नाही.<br>(३) हॉटेल/विश्रामगृहामध्ये व्यवस्था करण्यापूर्वी संबंधित विभागास राजशिष्टाचार उप विभागाकडून तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करणे आवश्यक राहील.<br>(४) सदर हॉटेल/विश्रामगृहामधील कक्षासाठी येणारा खर्च **प्रति अधिकारी प्रति दिन रु. २,५०० च्या** खर्चाच्या मर्यादेपेक्षा जास्त असू नये.<br>(५) हॉटेल/विश्रामगृहामधील वास्तव्यासाठी खर्चाच्या प्रतिपूर्तीची मागणी करताना शासकीय अधिकाऱ्यांस हॉटेल/विश्रामगृहामधील राहण्याच्या/राहण्याचा व जेवणाचा आलेला प्रत्यक्ष खर्च, सर्वसाधारणपणे अनुज्ञेय असलेल्या भत्याच्या रकमेच्या प्रति दिनी मर्यादेच्या अनुषंगाने मागणी करून अंतिमत: एकच पावती सादर करावी लागेल.<br>(६) मुंबई वित्तीय नियमातील संबंधित नियमामधील तरतुदींचे आणि याविषयी वेळोवेळी काढण्यात आलेल्या कार्यकारी आदेशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>(७) आवश्यक निधी उपलब्ध असला पाहिजे. |

**विषय :- विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी व जिल्हापरिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी / मुंबईत आयोजित केलेल्या शासकीय बैठकीसाठी उपस्थित राहण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

शासन परिपत्रक, क्रमांक - संकीर्ण-२००१/प्र.क्र.८९/३१,

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक ३ जानेवारी २००३

## परिपत्रक

शासनाच्या विविध योजना, जनतेचे प्रश्न, नैसर्गिक आपत्ती, इत्यादी बाबीविषयी चर्चा करण्यासाठी मंत्री महोदय वा संबंधित मंत्रालयीन विभाग मुंबईत बैठका आयोजित करीत असतात. अशा बैठकीसाठी इतर संबंधित क्षेत्रीय अधिकाऱ्यांशिवाय विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी वा जिल्हापरिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनाही बोलविण्यात येते.

जिल्हाधिकाऱ्यांवर सोपविण्यात आलेल्या महत्वाच्या कामाच्या जबाबदाऱ्या लक्षात घेऊन महसूल व वन विभागाच्या संमती शिवाय त्यांना मुंबईला बोलावू नये, अशा सूचना महसूल व वन विभागाचे परिपत्रक क्रमांक - संकीर्ण-११८८/४०५८/ई-१, दिनांक ४ ऑक्टोबर, १९८८ अन्वये देण्यात आल्या आहेत. तसेच जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनीही मा.राज्यपाल, मा. मुख्य मंत्री, मा. उप मुख्यमंत्री, मा. मंत्री (ग्राम विकास), मा.राज्यमंत्री (ग्राम विकास), मुख्य सचिव व सचिव (ग्राम विकास) यांच्या व्यतिरिक्त इतरांनी बोलविलेल्या बैठकीकरिता प्रशासनिक विभागाची पूर्व परवानगी घेतल्याशिवाय मुख्यालय सोडू नये, अशा सूचना ग्राम विकास व जल संधारणा विभागाचे दिनांक ४ फेब्रुवारी १९९९ च्या परिपत्रक क्रमांक - झेडएनजी-१०९८/प्र.क्र.२१६/११ अन्वये देण्यात आल्या आहेत. महसूल व वन विभागाच्या परिपत्रकातीलही सूचना मा. राज्यपाल, मा. मुख्य मंत्री, मा.उप मुख्यमंत्री व मा.मुख्य सचिव यांनी बोलविलेल्या बैठकांकरिता लागू होणार नाहीत. सदर सूचनांचे पालन करून ज्या विभागीय आयुक्तांना, जिल्हाधिकाऱ्यांना व मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांना मुंबईत बोलाविले जाते त्यावेळी त्यांची निवासाची होणारी गैरसोय टाळण्याकरीता पुढीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत :—

(१) सध्या उपलब्ध असलेले ई-मेल, फॅक्स, टेलिकॉन्फरन्स असे प्रगत मार्ग तसेच शासनाचे काटकसरीचे धोरण लक्षात घेऊन मुंबई बाहेरील क्षेत्रीय अधिकाऱ्यांना अत्यंत आवश्यक असेल तेव्हाच बैठकीसाठी मुंबईला बोलवावे.

(२) विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना बैठकीसाठी बोलविण्यापूर्वी संबंधित विभागाने प्रधान सचिव, महसूल यांची संमती घ्यावी व त्याचा उल्लेख बैठकीसाठी पाठविण्याच्या पत्रात असावा. तसेच विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी प्रधान सचिव (महसूल) महसूल व वन विभाग व जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी सचिव, ग्राम विकास विभाग यांच्या पूर्वपरवानगीनेच अशा बैठकांना उपस्थित रहावे.

(३) अशा प्रकारे पूर्व परवानगी न घेता उपरोक्त अधिकारी मुंबई येथील बैठकांना उपस्थित राहिल्यास त्यांना दैनिक व प्रवास भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

(४) मुंबईत येणाऱ्या विभागीय आयुक्तांची निवास व्यवस्था राजशिष्टाचार उप विभागाच्या अखत्यारितील हायमाऊंट या राज्य अतिथी गृहात करता येईल. त्या करिता संबंधित बैठकीचे आयोजन करणाऱ्या विभागाचे कमीत कमी ३ ते ४ दिवस आधी राजशिष्टाचार उप विभागास लेखी विनंती करणे आवश्यक राहील. हायमाऊंट हे राज्य अतिथीगृह असल्याने या ठिकाणी प्राथम्याने राज्य अतिथींची निवास व्यवस्था करण्यात येत असते. यास्तव संबंधित विभागाने हायमाऊंट अतिथीगृहात निवासाची व्यवस्था उपलब्ध होईल यावर विसंबून न राहता सार्वजनिक बांधकाम विभागाशी संपर्क साधून पर्यायी निवासस्थानाची व्यवस्था करून ठेवावी.

(५) मुख्य सचिवांनी प्रमाणित केलेल्या राज्यस्तरीय सभा / परिषदांना (ज्यात सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निमंत्रीत करण्यात येईल ) उपस्थित राहणाऱ्या वरील अधिकाऱ्यांकरिता शासकीय विश्रामगृहात व हायमाऊंट अतिथीगृहात कक्षबंध उपलब्ध नसल्यास सदर अधिकाऱ्यांची निवास व्यवस्था प्रति अधिकारी प्रति दिन रुपये १,००० या खर्चाच्या मर्यादेपर्यंत खाजगी हॉटेल अथवा विश्रामगृहात राहण्यासाठी करता येईल. तथापि हॉटेल्स मध्ये निवास व्यवस्था करण्यापूर्वी संबंधित विभागास राजशिष्टाचार उप विभागाकडून तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे ना- हरकत प्रमाणपत्र प्राप्त करणे आवश्यक राहील. सदरची व्यवस्था करणे व त्यावरील खर्च भागविण्याची जबाबदारी राज्य स्तरीय सभा व परिषदा आयोजित करणाऱ्या विभागाची राहील. हॉटेल कक्ष भाड्याने घेणेबाबत संबंधित विभागांना योग्य ते अधिकार प्रदान करण्याची कार्यवाही वित्त विभागाकडून करण्यात येईल.

मुंबईत शासकीय बैठक आयोजितांना वरील निदेशानुसार कार्यवाही करण्याची दक्षता सर्व मंत्रालयीन विभागांनी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अजित मु. निंबाळकर,**

मुख्य सचिव.

प्रति,

(१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई ,

(२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ,

(३) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ,

(४) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ,

(५) सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ,

(६) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,

(७) सर्व मंत्रालयीन विभाग ,

(८) सर्व विभागीय आयुक्त,

(९) सर्व जिल्हाधिकारी ,

(१०) सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी ,

(११) निवड नस्ती.